**श्री. कैलास शालीक बाऊस्कर, हवालदार, मुंबई जिल्हा महिला कारागृह यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या न्यायालय अवमान याचीका क्रमांक ५४/२०१७ प्रकरणी शासनाची बाजु न्यायालयात मांडण्याकरीता विशेष समुपदेशी म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. चंद्रकांत चंद्रात्रे यांच्या व्यावसाय शुल्कास मंजुरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्रमॅट-०३१७/२५/प्र.क्र.५९/तुरुंग-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : १६ ऑक्टोबर, २०१८

**प्रस्तावना :**

श्री. कैलास शालीक बाऊस्कर, हवालदार, मुंबई जिल्हा महिला कारागृह यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे ५४/२०१७ अन्वये दाखल केलेल्या न्यायालयीन अवमान याचीका प्रकरणी (मुळ अर्ज क्रमांक १७३/२०१७) शासनाची बाजू प्रभावीपणे मांडण्यासाठी ॲड. चंद्राकांत चंद्रात्रे यांची शासनाच्या दिनांक १८.१२.२०१७ रोजीच्या पत्रान्वये नियुक्ती केली आहे. सदरच्या प्रकरणी वकिलांनी फी स्वरुपात केलेला खर्च रु. १०,०००/- (रु. दहा हजार मात्र) इतक्या न्यायायलीन खर्चास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

उपरोक्त प्रस्तावनेस अनुसरुन, श्री. कैलास शालीक बाऊस्कर, हवालदार, मुंबई जिल्हा महिला कारागृह यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या न्यायालयीन अवमान याचीका ५४/२०१७ (मुळ अर्ज क्रमांक १७३/२०१७) प्रकरणी शासनाची बाजू प्रभावी पणे मांडण्यासाठी नियुक्त केलेल्या ॲड. चंद्रकांत चंद्रात्रे यांना रू. १०,०००/-(दहा हजार) इतक्या न्यायालयीन खर्चास प्रतिपुर्ती करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्र. अर्थसं-२०१७/ प्र.क्र.७५/ अर्थ-३ च्या शासन परिपत्रकान्वये खर्चासाठी तरतूद उपलब्ध असेल व खर्च मंजुरीचे विभागास वित्तीय अधिकार असल्यास परत निधी वितरणास वित्त विभागाची सहमतीची आवश्यकता नसल्याने त्या-त्या विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षिय अधिका-यांकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड. चंद्रात्रे यांना अपरिणामकारक सुनावणी फी व अन्य कोणतेही फी वां भत्ते अनुज्ञेय असणार नाही.

४. यासाठी येणारा खर्च अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, पुणे या कार्यालयाच्या मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशिर्ष २०५६ तुरुंग (००१) संचालन व प्रशासन (००)(०१) कारागृह निरीक्षणालय (२०५६००२६) (२८) व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. उपरोक्त प्रमाणे ॲड. चंद्रात्रे यांना न्यायालयीन खर्चाची प्रतिपुर्ती करण्याबाबतची कार्यवाही अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तात्काळ करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१५४४२५८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saguna G Thengil

Digitally signed by Saguna G Thengil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc135025943cb93cc90de6ceb564ced5ea3, cn=Saguna G Thengil
Date: 2018.10.16 15:50:28 +05'30'

(स. ग. ठेंगिल)
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई.
३) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई.
४) ॲड चंद्रकांत चंद्रात्रे (द्वारा :- अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे).
५) निवड नस्ती कार्यासन तुरुंग-१.